**रुबी हॉल क्लिनिक, पुणे अवैध किडनी रॅकेट चौकशी समिती अध्यक्षांचे मानधन व आयोगाच्या वकीलाचा सुनावणीसाठीच्या इ. खर्चास मान्यता देणेबाबत**

## महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पूरक-२०२४/प्र.क्र.९८/E-९५३५१८/आरोग्य-६**

गो.ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला,
मंत्रालय, एल.टी. मार्ग, मुंबई
दिनांक: २९ मार्च, २०२५.

<u>वाचा -</u>

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. माअप्र-२०२३/प्र.क्र.१२७/आरोग्य-६, दिनांक १८ जुलै, २०२३.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. माअप्र-२०२३/प्र.क्र.१२७/आरोग्य-६, दिनांक २५ ऑक्टोबर, २०२३.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. माअप्र-२०२३/प्र.क्र.१२७/आरोग्य-६, दिनांक ०३ सप्टेंबर, २०२४.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. माअप्र-२०२३/प्र.क्र.१२७/आरोग्य-६, दिनांक २६ सप्टेंबर, २०२४.
५) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. माअप्र-२०२३/प्र.क्र.१२७/आरोग्य-६, दिनांक १३ फेब्रुवारी, २०२४.
६) सहसंचालक (रुग्णालये-राज्यस्तर), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे क्र. आसेआ/ माअप्र/कक्ष-२०/रुबीहॉलक्लिनिक/चौकशीसमितीमानधन/पुरवणीमागणी/निधीवितरण/३३-३४/ २५, दिनांक २७.०१.२०२५

<u>प्रस्तावना</u> -

महाराष्ट्र विधानमंडळ अर्थसंकल्पिय अधिवेशन, २०२३ मध्ये प्रश्नोत्तराच्या वेळी विधानसभा सभागृहात झालेल्या चर्चेत दिनांक १७.०३.२०२३ रोजी तत्कालीन मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण यांनी रुबी हॉल क्लिनिक, पुणे येथील अवैध किडनी रॅकेटबाबत मा. उच्च न्यायाल्याच्या सेवानिवृत्त न्यायाधिशांच्या अध्यक्षतेखाली शासकीय आणि अशासकीय सदस्यांची चौकशी समिती नेमून तीन महिन्यात अहवाल सादर करण्यात येईल, असे आश्वासन दिले होते. त्याअनुषंगाने संदर्भ क्र. ३ दिनांक ०३ सप्टेंबर, २०२४ च्या शासन निर्णयान्वये व संदर्भ क्र. ४ येथील शासन शुध्दीपत्रक दिनांक २६ सप्टेंबर, २०२४ नुसार चौकशी समितीचे गठन करण्यात आले आहे. संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये

सदर समिती कामकाजास दिनांक ३१.०३.२०२५ पर्यंत मुदतवाढ दिलेली आहे. जुलै, २०२४ च्या पावसाळी अधिवेशनात रु. ७०.०० लक्ष इतक्या रक्कमेचा पुरवणी मागणी प्रस्तावास मान्यता दिलेली आहे. सदर मान्य पुरवणी मागणीच्या अनुषंगाने सदर समितीच्या अध्यक्षांचे व सदस्यांचे मानधन व वकीलाची फी अदा करण्यासाठी रु. ७०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**-

रुबी हॉल क्लिनिक अवैध किडनी रॅकेटची चौकशी करण्याकरीता सेवानिवृत्त न्यायाधीश मा.उच्च न्यायालय यांचे अध्यक्षतेखाली नेमलेल्या चौकशी समितीचे अध्यक्ष सेवानिवृत्त न्यायाधिश श्री. संदिप शिंदे यांचे मानधन दरमहा रू.५,००,०००/- व शासनाच्या वतीने वकील म्हणून बाजू मांडण्यासाठी ॲड. साहिल दीपक साळवी प्रति सुनावणी रु. २५,०००/- प्रमाणे फी व समितीचा इतर खर्च भागविण्यासाठी रु. ७०,००,०००/- (अक्षरी रुपये सत्तर लाख) इतका निधी आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांना वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. दिनांक ०३ सप्टेंबर, २०२४ व दिनांक २६ सप्टेंबर, २०२४ मधील तरतूदीनुसार समितीच्या अटी व शर्ती तपासून, वरील प्रदाने आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांनी करावी.

२. सदरील खर्च खालील दिलेल्या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक आर-१**

२२१० वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य,

(०१) (०९) महाराष्ट्र आरोग्य सेवा व विकास प्रकल्प अंतर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयांचे जिल्हा रुग्णालयांमध्ये श्रेणीवर्धन

(२२१०४६२४) २८- व्यवसायिक फी

३. रु.७०,००,०००/- (अक्षरी रुपये सत्तर लाख) इतक्या अनुदानाचे देयक आहरित करुन वितरित करण्यासाठी मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक आरोग्य सेवा, परिमंडळ, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच चौकशी समितीचे सदस्य सचिव तथा उपसंचालक, आरोग्य सेवा, परिमंडळ पुणे हे नियंत्रक अधिकारी असतील.

४. सदर शासन निर्णय ई-ऑफिसद्वारे नियोजन विभागाने व वित्त विभागाने File No: PHD-27017/3/2025-PHD (Arogya-6) Public Health Department Computer No 953518 अनुक्रमे Note 11 व Note १६ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२९१२०६५६९११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Public Health Department, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81e4e52421d72a2ae32df6c7d06abb4e6a7b5820c3a929f328ad6c0dca4f38c7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2025.03.29 12:15:34 +05'30'

**(नीलम संगवई)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
६. सह संचालक, (रुग्णालये-राज्यस्तर), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई/पुणे.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ, पुणे
९. मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक आरोग्य सेवा, पुणे
१०. सहाय्यक संचालक (लेखा व लेखा परीक्षा), आरोग्य सेवा, पुणे
११. सहाय्यक संचालक (माअप्र), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
१२. वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थ-९, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती.